**आशियाई विकास बँक अर्थसहाय्यित महाराष्ट्र ॲग्रीबिझनेस नेटवर्क (मॅग्नेट) प्रकल्पामध्ये समाविष्ट फळ-फुलपिकांबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः मॅग्नेट ०८२४/प्र.क्र.२४५ /२१-स**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक: २१ फेब्रुवारी, २०२५.

**वाचा:-**

१) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र.कृपमं-०११८/प्र.क्र.१३/२१-स, दि.३०.०९.२०२०.
२) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र.योजना-१०२०/प्र.क्र.१८३/२१-स, दि.१९.१०.२०२०.
३) शासन पत्र, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र.मॅग्नेट-०९२१/प्र.क्र.१७६/२१-स, दि.५.०४.२०२३
४) आशियाई विकास बँकेचा (ADB) दि.१४ एप्रिल,२०२३ चा ई-मेल संदेश.

**प्रस्तावना:-**

आशियाई विकास बँक (ADB) अर्थसहाय्यित महाराष्ट्र ॲग्रीबिझनेस नेटवर्क (Maharashtra Agribusiness Network-MAGNET) प्रकल्प ६ वर्षासाठी राज्यातील सर्व जिल्हयांमध्ये राबविण्यास संदर्भ क्र.१ येथील दि.३०.०९.२०२० रोजीच्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेली आहे.

सदर प्रकल्पामध्ये डाळींब, केळी, संत्रा, मोसंबी, सिताफळ, पेरू, चिकू, स्ट्रॉबेरी, भेंडी व मिरची (हिरवी व लाल), फुलपीके याप्रमाणे ११ फलोत्पादन पीके व फुलपीके यांचा समावेश होता. सदर फलोत्पादन पिके व फुलपिके यांच्या मुल्यसाखळ्या विकासित करणे, खाजगी गुंतवणुक आकर्षित करणे, फळे/भाजीपाल्याचे काढणी पश्चात नुकसान कमी करणे, वितरणक्षमता कार्यक्षम करणे आणि शेतकरी उत्पादक संस्थांचा मुल्यसाखळीतील सहभाग वाढविणे व महिला व दुर्बल घटकांचा सहभाग वाढविणे हे प्रकल्पाचे मुख्य उद्देश आहेत.

महाराष्ट्र ॲग्रीबिझनेस नेटवर्क (MAGNET) प्रकल्पाच्या अंमलबजावणीसाठी संदर्भ क्र.२ येथील दि.१९.१०.२०२० च्या शासन निर्णयान्वये मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली “राज्यस्तरीय प्रकल्प सुकाणू समिती” स्थापना करण्यात आली आहे. सदर समितीच्या दि.२७.०३.२०२३ रोजी झालेल्या बैठकीत सुकाणू समितीने, आशियाई विकास बँकेकडून आणखी आंबा, काजू, लिंबू व पडवळ या ४ पिकांचा मॅग्नेट प्रकल्पामध्ये समावेश करण्यास मान्यता प्राप्त झाल्यानंतर, प्रकल्प व्यवस्थापन पुस्तिकेत ज्या ठिकाणी ११ पिकांचा उल्लेख असेल त्या ठिकाणी १५ पिकांचा उल्लेख करण्यास व त्याअनुषंगाने अनुषंगीक बदल करण्यास संदर्भ क्र.३ येथील इतिवृत्तानुसार मान्यता दिली आहे.

त्यानुसार आशियाई विकास बँकेने संदर्भ क्र.४ येथील दि.१४.०४.२०२३ च्या ई मेल संदेशान्वये आंबा, काजू, लिंबू व पडवळ या ४ पिकांचा मॅग्नेट प्रकल्प व्यवस्थापन पुस्तिकेत समावेश करण्यास मान्यता दिली आहे. त्यामुळे मॅग्नेट प्रकल्पांतर्गत समाविष्ट फळ-फुलपिकांची एकूण संख्या १५ झाली आहे. या संदर्भात शासन निर्णय निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

महाराष्ट्र ॲग्रीबिझनेस नेटवर्क (MAGNET) या प्रकल्पामध्ये समाविष्ट डाळींब, केळी, संत्रा, मोसंबी, सिताफळ, पेरू, चिकू, स्ट्रॉबेरी, भेंडी व मिरची (हिरवी व लाल), फुलपीके या ११ फलोत्पादन पीके व फुलपीके यामध्ये आशियाई विकास बँकेने दिलेल्या मान्यतेनुसार दि.१४.०४.२०२३ पासून आंबा, काजू, लिंबू व पडवळ या आणखी ४ पिकांचा समावेश करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे. त्यामुळे मॅग्नेट प्रकल्पांतर्गत समाविष्ट फळ-फुलपिकांची एकूण संख्या १५ होईल.

२. सदर शासन निर्णय "राज्यस्तरीय प्रकल्प सुकाणू समिती"ने दि.२७.३.२०२३ रोजीच्या बैठकीत दिलेल्या मान्यतेनुसार व आशियाई विकास बँकेने दि.१४.४.२०२३ रोजीच्या पत्रान्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०२२११४२१३१५५०२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MADHAVI SANDEEP SHINDE

Digitally signed by MADHAVI SANDEEP SHINDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT,
2.5.4.20=020531e249e88fe74bf6db805f42944e7f29bc0ba6134c83c1f183b8cc27f2ff, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=4CB1CBBD6A4EE442FDAA6C1B358BF61FEAF9AEFC16E8F39E9EE1D06B9E8A7A59, cn=MADHAVI SANDEEP SHINDE
Date: 2025.02.21 14:22:52 +05'30'

**( माधवी सं. शिंदे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधान सभा / परिषद, विधानभवन, मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.उपमुख्यमंत्री (नगर विकास, गृहनिर्माण,सार्वजनिक बांधकाम )यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा.उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन )यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा.मंत्री (पणन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. सर्व मा.मंत्री/मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
७. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
८. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव (पणन/वित्त/नियोजन), मंत्रालय, मुंबई.
९. पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१०. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य कृषी पणन मंडळ, पुणे.
११. प्रकल्प संचालक, महाराष्ट्र ॲग्रीबिझनेस नेटवर्क (मॅग्नेट) प्रकल्प, पुणे.
१२. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य -१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षा) मुंबई.
१३. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य -२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षा) नागपूर.
१४. सहसंचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, मंत्रालयासमोर, मुंबई-४०० ०३२.
१५. सर्व जिल्हा कोषागार अधिकार
१६. निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई.
१७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१८. उपसचिव, वित्त विभाग (व्यय-२/अर्थबळ), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
१९. उपसचिव, नियोजन विभाग (कार्यासन १४३१), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
२०. अवर सचिव/कक्ष अधिकारी (१७-स/रोखशाखा), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
२१. निवडनस्ती (२१-स).